नागपूर जिल्ह्यातील मिहान प्रकल्पाच्या अंमलबजावणीसंदर्भात मार्गदर्शन करण्यासाठी सल्लागार समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. मविवि १२१५/प्र.क्र.५६/२८-अ**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक - १६/०३/२०१५

**वाचा** - १) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. खाक्षेस-२०००/प्र.क्र.१२/रस्ते-८, दिनांक ०२/०५/२०००
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एव्हीएन-१००१/(प्र.क्र.६२/२००१)/२८-अ, दि. ०१/१०/२००१
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एव्हीएन १००१/(प्र.क्र.१०५/२००१)/२८-अ, दि. ०४/०१/२००२
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एव्हीएन-१००१/प्र.क्र.६१/२००१/२८-अ, दि. १२/०८/२००४
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एव्हीएन-१००५/प्र.क्र.६३/२००५/२८-अ, दि. १३/०५/२००५

**प्रस्तावना** -

विदर्भाच्या सर्वांगीण विकासासाठी राज्य शासन नागपूर जिल्ह्यात आंतरराष्ट्रीय प्रवासी व माल वाहतूक हब विमानतळ (मिहान) प्रकल्प राबवित असुन या प्रकल्पाच्या प्रगतीचा आढावा घेऊन मार्गदर्शन करण्यासाठी कार्यबलाचे गठन संदर्भ क्र. १ येथील दि.०२/०५/२००० रोजीच्या शासन निर्णयाद्वारे करण्यात आले होते. तसेच त्यानंतर संदर्भ क्र. २,४ व ५ येथील शासन निर्णयांद्वारे देखील मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली कृतीगट / कार्यबल गठीत करण्यात आले होते. त्याचप्रमाणे संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयाद्वारे देखील एक प्रकल्प गट गठीत करण्यात आला होता. तथापि, सद्यःस्थितीत हे कृतीगट/ कार्यबल/ प्रकल्पगट कार्यरत असल्याचे दिसुन येत नाही.

संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयाद्वारे मिहान प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीची स्थापना करण्यात आली असुन मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील संचालक मंडळाद्वारे कंपनीच्या कामकाजाचे नियमन करण्यात येते. त्यामुळे संदर्भ क्र. १,२,३,४ व ५ येथील शासन निर्णयांद्वारे गठीत करण्यात आलेल्या कृतीगट/प्रकल्पगट/कार्यबलांची पुर्नरचना करुन सल्लागार समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे;

**शासन निर्णयः-**

संदर्भ क्र. १,२,४ व ५ येथील शासन निर्णय रद्द करण्यात येत आहेत. तसेच संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयातील प्रकल्पगट रद्द करण्यात येत आहे.

राज्य शासनाच्या वतीने महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीमार्फत नागपूर येथे विकसित करण्यात येत असलेल्या आंतरराष्ट्रीय प्रवासी व माल वाहतुक हब विमानतळ प्रकल्प (मिहान) प्रकल्पाच्या कामास गती देण्याच्या दृष्टीने वेळोवेळी मार्गदर्शन करण्याकरिता खालीलप्रमाणे सल्लागार समिती स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पद |
|---|---|---|
| १ | मा. श्री. नितीनजी गडकरी, मंत्री, परिवहन, महामार्ग, जहाजबांधणी, भारत सरकार | अध्यक्ष |
| २ | मा. श्री. चंद्रशेखर बावनकुळे, मंत्री उर्जा व अपारंपारिक उर्जा, महाराष्ट्र राज्य आणि पालकमंत्री, नागपूर जिल्हा | सदस्य |
| ३ | मा. श्री. समीर मेघे, विधानसभा सदस्य, हिंगणा | सदस्य |
| ४ | उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई | सदस्य |
| ५ | श्री. विजय राऊत, स्थानिक शेतकरी, नागपूर | सदस्य |
| ६ | श्री. विलास काळे, अध्यक्ष/ पदाधिकारी, विदर्भ इकॉनॉमिक डेव्हलपमेंट कौन्सिल, नागपूर | सदस्य |
| ७ | अध्यक्ष/प्रतिनिधी, विदर्भ इंडस्ट्रीज असोसिएशन, नागपूर | सदस्य |
| ८ | अध्यक्ष/प्रतिनिधी, एमआयडीसी इंडस्ट्रीज असोसिएशन, नागपूर | सदस्य |
| ९ | अध्यक्ष / प्रतिनिधी, बुटीबोरी मॅन्युफॅक्चरींग असोसिएशन, नागपूर | सदस्य |
| १० | श्री. हेंमत मनोहर गांधी, सचिव / प्रतिनिधी, नागपूर विदर्भ चेंबर ऑफ कॉमर्स, नागपूर | सदस्य |
| ११ | श्री. तेजविंदरसिंह रेणू, नागपूर | सदस्य |
| १२ | श्री. किशोर वानखेडे, नागपूर | सदस्य |
| १३ | मुख्य अभियंता, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर | सदस्य सचिव |

प्रकल्पामध्ये येणाऱ्या अडीअडचणींचा आढावा घेऊन प्रकल्प गतीने पूर्ण करण्यासाठी सल्लागार समिती वेळोवेळी मार्गदर्शन करेल.

सदर सल्लागार समिती पुढील आदेश होईपर्यंत कार्यान्वित राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक २०१५०३१६१५५४३४९६०७ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2015.03.16 16:05:50 +05'30'

**समीर सावंत**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव

२) मा. श्री. नितीनजी गडकरी, मंत्री, परिवहन, महामार्ग, जहाजबांधणी, भारत सरकार यांचे खाजगी सचिव.

३) मा. श्री. चंद्रशेखर बावनकुळे, मंत्री, उर्जा व अपारंपारिक उर्जा आणि पालकमंत्री, नागपूर जिल्हा यांचे खाजगी सचिव.
४) मा. श्री. समीर मेघे, विधानसभा सदस्य, हिंगणा
५) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई
६) श्री. विजय राऊत, स्थानिक शेतकरी, नागपूर, मार्फत - मुख्य अभियंता, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर
७) श्री. विलास काळे, अध्यक्ष/ पदाधिकारी, विदर्भ इकॉनॉमिक डेव्हलपमेंट कौन्सिल, नागपूर, मार्फत - मुख्य अभियंता, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर
८) अध्यक्ष/प्रतिनिधी, विदर्भ इंडस्ट्रीज असोसिएशन, नागपूर, मार्फत - मुख्य अभियंता, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर
९) अध्यक्ष/प्रतिनिधी, एमआयडीसी इंडस्ट्रीज असोसिएशन, नागपूर, मार्फत - मुख्य अभियंता, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर
१०) अध्यक्ष / प्रतिनिधी, बुटीबोरी मॅन्युफॅक्चरींग असोसिएशन, नागपूर, मार्फत - मुख्य अभियंता, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर
११) श्री. हेंमत मनोहर गांधी, सचिव / प्रतिनिधी, नागपूर विदर्भ चेंबर ऑफ कॉमर्स, नागपूर, मार्फत - मुख्य अभियंता, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर
१२) श्री. तेजविंदरसिंह रेणू, नागपूर, मार्फत - मुख्य अभियंता, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर
१३) श्री. किशोर वानखेडे, नागपूर, मार्फत - मुख्य अभियंता, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर
१४) मुख्य अभियंता, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, नागपूर
१५) अपर मुख्य सचिव (विमानचालन) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०००३२
१६) उपसचिव, कार्यासन २८-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२
१७) निवडनस्ती, कार्यासन २८-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.